**राज्यातील शासकीय, स्वयंसेवी संस्था, अनुदानित व विना-अनुदानित बालगृह, मतिमंद मुला-मुलींची बालगृहे या संस्थांमधील अत्याचार, लैंगिक अत्याचार / शोषण याबाबत तपास करणाऱ्या अधिकाऱ्यास सहाय्य करण्याकरीता समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय क्र. पीआयएल-२०११/प्र.क्र. ३४७/का-८,
नविन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : १२ ऑक्टोबर, २०११.

**प्रस्तावना :**

राज्यातील शासकीय, स्वयंसेवी अनुदानित व विना-अनुदानित नोंदणीकृत बालगृहांची तपासणी करण्याबाबत आणि विशेष काळजीची गरज असलेल्या प्रवेशितांची विशेष काळजी घेण्याबाबतच्या सूचना शासन स्तरावरुन वारंवार देऊनही अलिकडे एका विना-अनुदानित मतिमंद बालकांसाठीच्या बालगृहातील मतिमंद मुलींवर लैंगिक अत्याचार झाल्याचे उघडकीस आलेले आहे. यानुषंगाने सुमोटो जनहित याचिका क्र.१८२/२०१० प्रकरणी दिनांक १९.९.२०११ रोजी झालेल्या सुनावणीत मा.उच्च न्यायालयाने, अशा प्रकरणी प्रत्येक टप्प्यावरील तपासणीबाबत मा.न्यायालयाच्या सूचनांची वाट न पहाता, तपासणी अधिकाऱ्यास आवश्यक त्या सूचना देण्यासाठी व सहाय्य करण्यासाठी एक समिती गठीत करावी, असे आदेश दिले आहेत. त्यानुषंगाने समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील शासकीय, स्वयंसेवी संस्था, अनुदानित व विना-अनुदानित बालगृह, निरिक्षणगृह, अनुरक्षणगृह व मतिमंद मुला-मुलींचे बालगृह या संस्थांमध्ये अत्याचार / लैंगिक शोषण या सारख्या घटना आढळून आल्यास अशा घटनेची चौकशी करणाऱ्या, तपासणी अधिकाऱ्यास सहाय्य करण्यासाठी खालील सदस्यांची समिती गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. उप आयुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संचालक (आरोग्य सेवा) यांनी नामनिर्देशित केलेले उप संचालक (आरोग्य सेवा) किंवा ज्या जिल्हयातील प्रवेशितांसंदर्भात चौकशी करावयाची आहे, तेथील आरोग्य केंद्रातील वरिष्ठ वैद्यकीय अधिकारी.
३. जिल्हा बाल कल्याण समितीचे सदस्य.
४. संबंधित जिल्हयाचे जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.

२. या समितीस मतिमंद मुला-मुलींचे बालगृह व सर्वसाधारण बालगृहातील झालेल्या लैंगिक अत्याचार प्रकरणी अत्याचारास / शोषणास बळी पडलेल्या प्रवेशितांची वैद्यकीय तपासणी, साक्ष घेणे व इतर चौकशी / तपास करणे याबाबत निर्णय घेण्याचे सर्व प्राधिकार असतील.

३. हा शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०१११०१२१७२२३७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( शं. शा. पढाळ )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, उपमुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
अध्यक्ष, राज्य सल्लागार मंडळ, पुणे.
अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
उप पोलीस महानिरिक्षक (पी.ए.डब्ल्यू.) पोलीस महासंचालक व महानिरिक्षक यांचे कार्यालय, मुंबई.
पोलीस आयुक्त (गुन्हे), गुन्हे अन्वेषण विभाग, मुंबई.
सचिव, महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, वरळी, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त, कोकण / पुणे / नाशिक / अमरावती / नागपूर / औरंगाबाद.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
प्रा.आशा बाजपेयी, अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य समन्वय समिती, द्वारा TISS, देवनार, मुंबई.
सर्व जिल्हा बाल कल्याण समित्या / बाल न्याय मंडळ.
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
सर्व अध्यक्ष / सदस्य, संस्थाचालक. (संबंधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचेमार्फत)
निवड नस्ती / का-८